**नागपूर जिल्हयातील गोरेवाडा येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन कण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी-१००९/प्र.क्र.११९/फ-१,
मंत्रालय,मुंबई : ४०० ०३२.
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०११.

**वाचा** :- १. शासन निर्णय क्रमांक : डब्लयुएलपी-१०९९/प्र.क्र.८९/फ-१, दि.१२ डिसेंबर, २००५.
२. महाराष्ट्र शासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई शासन निर्णय क्रमांक डब्ल्यूएलपी-१००७/प्र.क्र. १४०/फ-१ दिनांक १० ऑगस्ट २००७.
३. शासन निर्णय क्रमांक : डब्लयुएलपी-२००४/प्र.क्र.५२/फ-१, दि.२७ जून, २००८.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-२२(६)/यो/गोरेवाडा/३११/२००९-१०, दिनांक १२ मे, २००९
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-२२(६)/यो/गोरेवाडा/७४९/२००९-१०, दिनांक १८ नोव्हेंबर, २००९
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-२२(६)/यो/गोरेवाडा/२२९/२००९-१०, दिनांक ५ जून, २०१०.

**प्रस्तावना** :-

मौजे गोरेवाडा, तालुका नागपूर येथे १०० ते १५० हेक्टर वन क्षेत्रावर आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन करण्यास संदर्भ क्रमांक १ अन्वये शासनाने तत्वतः मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्रमांक २ नुसार प्रस्तावित प्राणीसंग्रहालयाचा बृहत आराखडा तयार करण्यासाठी मे. बर्नाड हॅरीसन ॲन्ड फ्रेंडस, सिंगापूर यांना सल्लागार म्हणून नेमण्यात आले. त्यानुसार सल्लागार यांनी दिनांक ५ मे, २००९ अन्वये प्राणीसंग्रहालयाचा बृहत आराखडा सादर केला. सदर आराखड्यानुसार गोरेवाडा नागपूर येथे असलेल्या १९१४ हेक्टर वन क्षेत्रावर आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन करण्याचे प्रस्तावित आहे. त्याचप्रमाणे दुर्मिळ तसेच राज्यातील या भागातून विलुप्त झालेल्या प्राण्यांचे प्रजनन करुन त्यांच्या नैसर्गिक अधिवासात त्यांचे पुन:स्थापन करणेही प्रस्तावित आहे. सदर प्रकल्प हा नागपूर शहरास लागून असल्याने या प्रकल्पामुळे या भागात निसर्ग पर्यटनास चालना मिळेल व रोजगाराच्या संधी उपलब्ध होतील. सदर पार्श्वभूमीच्या अनुषंगाने मौजे गोरेवाडा, तालुका-जिल्हा नागपूर येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

**१)** राज्यात निसर्ग पर्यटन विकास व वन्यप्राणी संवर्धनाकरीता मौजे गोरेवाडा, तालुका-जिल्हा नागपूर येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन करण्यास परवानगी देण्यात येत आहे. सदर प्रकल्प एफ.डी.सी.एम. लिमिटेड मार्फत राबविण्यात येईल.

## २) प्राणिसंग्रहालयाचे प्रमुख उद्देश :-

(१) आंतराष्ट्रीय निसर्ग पर्यटनास चालना देणे.

(२) वन्यजीव संवर्धन (दुर्मिळ झालेल्या प्राण्यांच्या प्रजातींचे शास्त्रोक्त पध्दतीने प्रजनन करणे व नंतर निसर्गात मुक्त करणे).

(३) वन्यजीव संवर्धनासंबंधी संशोधन व शिक्षण.

(४) जखमी झालेल्या, आजारी प्राण्यांच्या तसेच परवानगी नसलेल्या जप्त वन्य प्राण्यांचे पुनर्वसन.

(५) मानव वन्यप्राणी संघर्षाच्या घटना कमी करण्यासाठी व असे प्रसंग हाताळण्यासाठी अद्यावत प्रशिक्षण केंद्र विकसित करणे.

(६) निसर्ग आधारीत शिक्षण, मनोरंजन व पर्यटनास चालना देणे.

(७) रोजगार / स्वयंरोजनगाराच्या संधी उपलब्ध करून देणे.

## ३) सदर प्रकल्पामध्ये खालील बाबींचा समावेश असेल :-

१) **गोंडवाना बायोपार्क** : पृथ्वीची उत्पत्ती (evolution), त्यावरील जैवविविधता तसेच वन्यजीव संवर्धन या विषयावरील बायोपार्कची संरचना करुन सदर पार्कमध्ये पायवाटा (walking trails), सरपटणा-या प्राण्यांची बाग (Reptile garden) तसेच मुलांकरीता निसर्ग उद्यान स्थापन करण्यात येतील.

२) **इंडियन सफारी** : भारतात आढळणाऱ्या प्राण्यांची सफारी स्थापन करण्यात येईल. त्याचप्रमाणे सदर सफारी ट्रॅम सवारी मार्फतही पाहता येईल, अशी उपाययोजना करण्यात येईल.

३) **आफ्रिकन सफारी :** आफ्रिकेत आढळणाऱ्या प्राण्यांची सफारी स्थापन करण्यात येईल. त्याचप्रमाणे सदर सफारी ट्रॅम सवारी मार्फत पाहता येईल, अशी उपाययोजना करण्यात येईल.

४) **रिव्हर राईड (River Ride)** : बोटीमार्फत पर्यटकांना वन्यप्राणी, पक्षी, वनस्पती, जलचर प्राणी इत्यादी पाहता यावेत याकरीता कालवा तयार करण्यात येईल.

५) **गोरेवाडा रिझर्व** : गोरेवाडा येथे तलावाच्या कडेला असलेल्या क्षेत्रावर गोरेवाडा रिझर्व्ह तयार करण्यात येऊन त्यामध्ये मध्य भारतातील वन्यप्राणी प्रदर्शनासाठी ठेवण्यात येतील. तसेच प्राण्यांचे पिंजरे या भागात राहणार नाहीत याची दक्षता घेण्यात येईल. असे केल्याने पिंज-यातील प्राण्यांचा मलमुत्रामध्ये तलावाचे पाणी दुषित होणार नाही, याची दक्षता घेतली जाईल.

६) **बचाव केंद्र व प्रजनन केंद्र** : जखमी झालेल्या, रोगग्रस्त, पकडण्यात आलेल्या तसेच परवानगी नसलेल्या प्राणीसंग्रहालयातील वन्यप्राण्याचा उपचार व पुनर्वसन करण्यासाठी बचाव केंद्र (Rescue Centre) त्याचप्रमाणे दुर्मिळ झालेल्या वन्यप्राण्यांचा प्रजननासाठी प्रजनन केंद्र (Conservation Breeding Centre) निर्माण करण्यात येईल.

७) **पर्यटकांसाठी सुविधा** : प्राणिसंग्रहालयात ये-जा करण्या-या पर्यटकांकरीता पार्किंग, रेस्टारंटस्, दुकाने, पिण्याचे पाणी प्रसाधनगृह, प्राणीसंग्रहालय पाहण्यासाठी वाहन, इत्यादीची व्यवस्था करण्यात येईल. प्राणीसंग्रहालयातील रेस्टारंटस् व दुकाने भाडे तत्वावर खाजगी कंपनीला लीजवर देण्यांत येईल. पर्यटकांसाठी सदर सोयी सुविधा, कर्मचा-यांसाठी निवासस्थाने व प्रशासकीय इमारती शक्यतोवर वनेत्तर शासकीय जमिनीवर उभारण्यात येतील. मात्र अत्यावश्यक सुविधा वनक्षेत्रात घेता येतील.

८) **इतर पायाभूत सुविधा** : प्रस्तावित प्राणीसंग्रहालयांतर्गत कुरण क्षेत्र, रोपवाटिका, रस्ता, संरक्षणासाठी पूर्ण क्षेत्राभोवती कुंपण, भिंत इत्यादींची उभारणी करण्यांत येईल. तसेच बायोगॅस व सौर विद्युत या अपारंपारिक उर्जा स्त्रोताचा उपयोगही करण्यांत येईल.

९) **शिक्षण व प्रसिध्दी** : वन्यजीव संरक्षण व संवर्धनाचे महत्व पर्यटकांना, शाळेतील मुलांना, शिक्षकांना व इतराना शिक्षण देण्याची व्यवस्था करण्यांत येईल. त्याचप्रमाणे प्राणीसंग्रहालयास जास्तीत जास्त लोकानी भेट द्यावी याकरीता सदर प्रकल्पास व्यापक प्रसिध्दी देण्यात येईल.

१०) **संशोधन** : स्थानिक विद्यापीठांसोबत वन्यजीव संबंधीत विविध विषयांवर संशोधन कार्यक्रम राबविण्याची व्यवस्था करण्यांत येईल.

वरील कार्यविधींची व्याप्ती व स्वरूप हे विशेष सल्लागार यांच्या सल्ल्याने पुनर्रचित प्रकल्प प्रस्तावानुसार राबविण्यात येतील.

## ४) विशेष उद्देश व्यवस्था (Special Purpose Vehicle) :-

(१) एफ.डी.सी.एम. लिमिटेड मार्फत गोरेवाडा प्राणीसंग्रहालय प्रकल्प राबविण्यासाठी विशेष उद्देश व्यवस्था (Special Purpose Vehicle) स्थापन करण्याकरीता एफ.डी.सी.एम. लिमिटेडचे Article ९२ (२) अंतर्गत असलेल्या तरतूदीला अनुसरून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(२) सदर विशेष उद्देश व्यवस्थे अंतर्गत एफ.डी.सी.एम. लिमिटेड आणि निवडलेल्या खाजगी उद्योजक यांची संयुक्त उपक्रम कंपनीची निर्मिती करण्यात यावी.

(३) विशेष उद्देश व्यवस्थे अंतर्गत राबविण्यात येणा-या प्रकल्पामध्ये शासनाचे भाग भांडवल ५१ टक्के एवढे असेल.

(४) गोरेवाडा प्राणीसंग्रहालयाच्या विविध सुविधांची उभारणी व त्याचे परीरक्षणाची जबाबदारी वरील प्रमाणे निर्मित विशेष उद्देश व्यवस्थेची (Special Purpose Vehicle) राहील. याकरीता आवश्यक असलेले कर्मचारीवृंदांची नेमणूक करणे तसेच प्राणीसंग्रहालयाचे प्रवेश शुल्क निश्चित करून वसुल करण्याचे अधिकार या विशेष उद्देश व्यवस्थेला राहतील.

(५) गोरेवाडा प्राणीसंग्रहालयाकरीता जमीनी व्यतिरिक्त शासनाच्या वतीने वर्ष २०११-१२ व २०१२-१३ या आर्थिक वर्षांमध्ये प्रत्येकी ५० कोटी याप्रमाणे एकूण १०० कोटी व्हायाबिलीटी गॅप फंडींग (VGF) म्हणून टप्प्याटप्प्याने शासनातर्फे देण्यात येईल.

(६) शासनाचे अनुदान एफ.डी.सी.एम. लिमिटेडमार्फत केवळ प्राणीसंग्रहालयाच्या भांडवली खर्चाकरीता वापरण्यात येईल. प्राणीसंग्रहालयाच्या पुढील परिरक्षणाची जबाबदारी विशेष उद्देश व्यवस्थेची राहील.

## ५) प्रकल्प कार्यान्वयन :-

(१) गोरेवाडा प्राणीसंग्रहालय प्रकल्पाकरीता गोरेवाडा येथील सर्व्हे क्रमांक २/१, २/२ व २/३ मधील २८.३७ हेक्टर वनेतर शासकीय जमीनीचा वापर पर्यटन विकासाकरीता वाणिज्यीक तत्वावर करण्यासाठी महाराष्ट्र वनविकास महामंडळाने आवश्यक प्रस्ताव शासनास सादर करावा. सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यावर महसूल विभाग त्यावर मान्यतेसंबंधात कार्यवाही करेल.

(२) विशेष उद्देश व्यवस्थेची स्थापना होईपर्यंत प्राणीसंग्रहालयाच्या विकासाची कामे करण्याकरीता "२४०६ वनीकरण व वन्यजीव" या प्रधान लेखाशिर्षाअंतर्गत गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणीसंग्रहालयाची कामे (राज्य) (२४०६२२५९) वर्ष २०११-१२ मध्ये रुपये २० कोटी अर्थसंकल्पित तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूद प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर तरतूदीव्दारे प्राणीसंग्रहालयाची विकासाची कामे एफ.डी.सी.एम.लि. मार्फत करुन घ्यावीत. त्याचप्रमाणे सदर तरतूद विकास कामांची प्रगती व आवश्यतेनुसार टप्प्या-टप्पाने वर्ग करण्यात येईल.

विशेष उद्देश व्यवस्था (Special Purpose Vehicle) स्थापन झाल्यानंतर सदरची २० कोटी तरतूद व त्यानंतर देण्यात येणारे अनुदान हे विशेष उद्देश व्यवस्थेचे भावी भाग भांडवल म्हणून मानण्यात येईल.

(३) गोरेवाडा प्राणीसंग्रहालय प्रकल्पाकरीता प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (Project Management Consultant) व्यापक जाहिरात देऊन नेमण्यात येईल. या व्यतिरिक्त आवश्यक ते विशेषज्ञ कंत्राट पद्धतीने नेमण्याची एफ.डी.सी.एम. लिमिटेडला मुभा राहील. यावर होणारा खर्च शासनाकडून भाग भांडवलाचे अनुदानातून करण्यात यावा.

(४) एफ.डी.सी.एम. लिमिटेडतर्फे गोरेवाडा प्राणीसंग्रहालय क्षेत्राचे संरक्षण भिंत बांधकामाचे काम त्वरीत सुरू करण्यात यावे.

(५) गोरेवाडा परिसरातील आढळणाऱ्या वन्यप्राण्यांना त्याच ठिकाणी नैसर्गिक अधिवास उपलब्ध व्हावा व त्यांचे in-situ conservation व्हावे यासाठी गोरेवाडा रिझर्वचा विकास अभयारण्य म्हणून करण्यात यावा. त्याकरीता वनसंवर्धन अधिनियम, १९८० व वन्यजीव संरक्षण अधिनियमास बाधा होणार नाही अशा रितीने अंतर्गत कुंपण, निसर्ग पायवाट पक्षी निरिक्षण कुटी व वन्यप्रणी अधिवास सुधारणा (Habitat Development) करणे इत्यादी कामे करण्यात यावेत.

## ६) सशक्त समित्यांचे गठण :-

सदर प्रकल्पाचे महत्व लक्षात घेता खालील प्रमाणे समित्यांचे गठण करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे. यापैकी मंत्रालय स्तरावर कार्यकारी सशक्तता समिती व क्षेत्रिय स्तरावर सशक्तता समिती ह्या प्रकल्पाकरीता विशेष उद्देश व्यवस्था कार्यरत होईपर्यंत अस्तित्वात राहतील.

### (१) मंत्रालय स्तरावरील कार्यकारी सशक्तता समिती.

| | |
|---|---|
| १. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. प्रधान सचिव (वने) | सदस्य |
| ३. प्रधान सचिव (वित्त) | सदस्य |
| ४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) | सदस्य |
| ५. व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम. लिमिटेड | सदस्य सचिव |

सदर समिती व्हायाबिलीटी गॅप फंडीग, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची नियुक्ती, अर्थसंकल्पिय तरतुद करणे व कामाच्या प्रगतीचा आढावा घेणे याबाबत नियंत्रण करेल. तसेच आंतरराष्ट्रीय बिडींगनंतर खाजगी भागीदाराची निवड करण्याचे अधिकारही या समितीला राहतील.

त्याचप्रमाणे रुपये २ कोटी रकमेपेक्षा जास्तीच्या कामांना मान्यता देण्याचे अधिकारही या समितीला राहतील.

### (२) क्षेत्रीय स्तरावरील सशक्तता समिती.

| | |
|---|---|
| १. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ | अध्यक्ष |
| २. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव पूर्व), नागपूर | सह अध्यक्ष |
| ३. विभागीय आयुक्त, नागपूर | सदस्य |
| ४. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर | सदस्य |
| ५. अध्यक्ष, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर | सदस्य |
| ६. जिल्हाधिकारी, नागपूर | सदस्य |
| ७. सह-संचालक (वित्त व कोषागारे), नागपूर | सदस्य |
| ८. मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | सदस्य |
| ९. संचालक, गोरेवाडा प्राणीसंग्रहालय | सदस्य सचिव |
| १०.उपसंचालक, नगर रचना, नागपूर | सदस्य |

सदर समिती प्रकल्प व्यवस्थापन घटकाच्या कामाचा आढावा घेईल. प्रकल्पाकरीता रुपये २ कोटी पर्यंत खर्च करण्याची व सदर कामांना प्रशासकीय / तांत्रिक मान्यता देणे व निविदा मान्य करण्याचे अधिकार सदर समितीला राहतील. प्रकल्प व्यवस्थापन घटक (PMU) करिता तांत्रिक मनुष्यबळ कंत्राटी पध्दतीने उपलब्ध करून घेण्याचे अधिकार सदर समितीला राहतील.

प्रकल्पाची प्रारंभिक कामे जसे क्षेत्र संरक्षित करण्यासाठी भिंतीचे कुंपण पी.एम.यु. स्थापन करण्यास पी.एम.सी. ची नियुक्ती करण्याकरीता उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतुद (रुपये २ कोटी) वापरण्याचे अधिकार सदर समितीला राहतील.

सदर प्रकल्प राबविणसाठी तयार केलेला बृहत आराखड्यातील संकल्पनेचा (Concept Paper) आधार घेऊन आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्राणीसंग्रहालय स्थापन करण्यासाठी देशांतर्गत सल्लागार नेमण्याचे अधिकार सदर समितीला राहतील.

**७)** दुर्मिळ झालेल्या प्राण्यांच्या प्रजातींचे शास्त्रोक्त पध्दतीने प्रजनन करणे, वन्यजीव संवर्धनासंबंधी संशोधन व शिक्षण, जखमी झालेल्या, आजारी प्राण्यांच्या तसेच परवानगी नसलेल्या जप्त वन्य प्राण्यांचे पुनर्वसन, मानव वन्यप्राणी संघर्षाच्या घटना कमी करण्यासाठी व असे प्रसंग हाताळण्यासाठी अद्यावत प्रशिक्षण केंद्र विकसित करणे याकरीता गोरेवाडा वन्यजीव प्रतिष्ठानाची स्थापना करण्यात येईल.

**८)** गोरेवाडा प्राणीसंग्रहालयाचे उभारणीकरीता संबंधीत अधिकारी व कर्मचारी यांना प्राणीसंग्रहालय व्यवस्थापनाचे प्रशिक्षण देण्यात यावे. तसेच गोरेवाडा सारखे स्वरूपाचे अस्तित्वात असलेले प्राणीसंग्रहालयांना अभ्यास भेटींचे आयोजन करण्यात यावे.

**९)** विशेष उद्देश व्यवस्था निर्मितीपूर्वी गोरेवाडा प्राणीसंग्रहालयासंबंधी स्थानिक जन प्रतिनिधी, उद्योजक, निसर्गप्रेमी यांची कार्यशाळा आयोजित करण्यात यावी व त्यांचे मत जाणून घेण्यात येवून त्यानुसार प्राणीसंग्रहालयाची उभारणी करण्यात यावी.

**१०)** संदर्भ क्रमांक २ मधील शासन निर्णय दिनांक १० ऑगस्ट २००७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे "गोरेवाडा प्रकल्प नागपूर स्थापन केलेल्या प्राधिकरणाच्या अधिपत्याखाली काम करेल व संचालक,

गोरेवाडा प्रकल्प, नागपूर हे उपरोक्त प्राधिकरणाचे सहयोगी सदस्य असतील" हे आदेश रद्द करण्यात येत आहेत. प्राधिकरणासंबंधीचा सुधारीत शासन निर्णय वेगळ्याने जारी करण्यात येत आहे.

११) सदर प्रकल्प केंद्रीय चिडीयाघर प्राधिकरण, सर्वोच्च न्यायालय व आवश्यकतेनुसार केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालय यांच्या अंतिम मान्यतेच्या अधीन राहून राबविण्यात येईल.

१२) सदर योजनेवर शासनाकडून होणारा खर्च २४०६-वनीकरण व वन्यजीव, ०१ वनीकरण (११०) वन्यजीवन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना (००) (१२) गोरेवाडा येथील प्रस्तावित प्राणीसंग्रहालयाची प्राथमिक कामे (राज्य) (२४०६-२२५९) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणा-या अनुदानातुन भागविण्यात यावा.

१३) सदर शासन निर्णय, महसूल विभाग, नियोजन विभाग तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक : ३०४/२०११/व्यय-१, दिनांक २५.११.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१४) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.Maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१११३०१६५३०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( विवेक खांडेकर)
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग.

प्रति,

प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, बोरीवली, मुंबई.
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक.
सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) / सर्व मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव)
विभागीय आयुक्त, नागपूर
आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
अध्यक्ष, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
जिल्हाधिकारी, नागपूर
सह-संचालक (वित्त व कोषागारे), नागपूर
मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर
संचालक, गोरेवाडा प्राणीसंग्रहालय
उपसंचालक, नगर रचना, नागपूर
सर्व वनसंरक्षक (वन्यजीव) / सर्व उपवनसंरक्षक (वन्यजीव)

कक्ष अधिकारी (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
कक्ष अधिकारी (विसु-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
कक्ष अधिकारी (विसु-१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ (निवडनस्ती).